GR-20040804124350001-1201

इंदिरा आवास योजनेअंतर्गत स्वच्छता गृहे, शौचालये विरहीत बांधलेल्या घरकुल अंदाजपत्रकातील फरकामुळे झालेल्या जादा खर्चाबाबत.

महाराष्ट्र शासन,

ग्राम विकास व जलसंधारण विभाग,

शासन निर्णय, क्र.जरोयो-१०९६/इंआयो/ड्राफ्ट पॅरा/प्र.क्र.४४२/जरो-१९,

मंत्रालय,मुंबई-४०० ०३२,

दिनांक- २९ नोव्हेंबर,१९९६.

महालेखापाल (लेखा परिक्षा)-१, महाराष्ट्र यांनी सन १९९५-९६ च्या लेखा परीक्षा अहवालात समाविष्ट करण्याबाबत."इंदिरा आवास योजनेअंतर्गत स्वच्छता गृहे शौचालये विरहीत बांधलेल्या घरकुलावरील अंदाजपत्रकातील फरकामुळे झालेल्या जादा खर्चाबाबत" निम्नलिखित आक्षेप घेतलेला आहे:-

केंद्र शासनाच्या मार्गदर्शक तत्वाप्रमाणे ग्रामीण भागातील दारिद्र्य रेषेखालील लक्षीत गटातील लाभार्थींना इंदिरा आवास योजनेअंतर्गत मोफत पुरविलेल्या घरकुलांना स्वच्छता गृह/शौचालय पुरविणे हा योजनेचा अविभाज्य घटक आहे. समितीच्या निकषाप्रमाणे त्याचा समावेश अंदाजपत्रकामध्ये करणे आवश्यक आहे. त्याप्रमाणे योजनेअंतर्गत बांधलेल्या घरकुलांना स्वच्छता गृह/शौचालय मोठ्या प्रमाणात पुरविली नसल्याचे लक्षात आले. ज्या घरकुलांना शौचालय पुरविण्यात आले त्याचा योग्य वापर लाभार्थीकडून होत नसल्याचे निदर्शनास आणले आहे. निकषाप्रमाणे स्वच्छता गृह/शौचालय हा घरकुलांचा अविभाज्य भाग असल्याने घरे बांधताना स्वच्छता गृह/शौचालय बांधकाम करणे आवश्यक आहे.

उद्दिष्ट सफलतेसाठी आपल्या जिल्ह्यात बांधण्यात आलेल्या घरकुलांचे शौचालयाचा लाभार्थीकडून योग्य तो वापर होण्यासाठी त्यांना प्रेरणा देणे आवश्यक आहे.

योजनेअंतर्गत घरकुल बांधकाम हाती घेताना केंद्र शासनाच्या निकषाप्रमाणे अंदाजपत्रकात आवश्यक मुलभूत सुविधा, स्वच्छता गृह/शौचालय बांधकामाची तरतूद करण्यासाठी सर्व संबंधितांना मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी सूचना द्याव्यात. तसेच ग्रामीण भागामध्ये इंदिरा आवास योजनेअंतर्गत पुरवण्यात आलेल्या शौचालयाचा वापर करण्याबाबत ग्रामीण जनतेचे उद्बोधन करणे आवश्यक आहे. परिसर अस्वच्छतेमुळे रोगराई पसरु शकते. या परिस्थितीत ग्रामीण जनतेने उघड्यावर प्रातर्विधी न करता शौचालयाचा वापर करणे आवश्यक आहे.

ग्रामीण जनतेचे प्रबोधन करण्याकरिता प्रसिध्दी माध्यमातून उदा:- मेळावे, बाजार, आरोग्य विषयक कार्यक्रम इत्यादीव्दारे शौचालयाचा वापर करणे कसे हितावह आहे हे सर्व जनतेला कळविण्यासाठी संबंधित यंत्रणा आणि अधिकारी/कर्मचारी यांचेमार्फत प्रयत्न करण्यात येईल याची दक्षता घ्यावी. हे साध्य करण्याकरिता मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी नियमितपणे आढावा घ्यावा.

आपला

[ र. बा. सावंत ]
सह सचिव,
ग्राम विकास व जलसंधारण विभाग.

प्रति,

सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तथा अध्यक्ष, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा,
सर्व उपमुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
सर्व प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा,
सर्व गट विकास अधिकारी, पंचायत समिती,
प्रधान महालेखाकार, [लेखा परिक्षा]१, महाराष्ट्र-१०१, महर्षि कर्वे मार्ग, मुंबई-४०० ०२०.
महालेखाकार, [लेखा परिक्षा]-२ महाराष्ट्र, नागपूर.